**श्री.बी.जी.भवाने, जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प.नंदुरबार यांची प्रशासकीय कारणास्तव बदली करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांक : मबाआ- २०२०/प्र.क्र.१९/कार्या-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- १० ऑगस्ट, २०२०

वाचा-

१. महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र. मबाआ-२०१५/प्र.क्र.२२/का-७-अ,दि.५.५.२०१५
२. महिला व बाल विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.मबाआ-२०१५/प्र.क्र.२२/का-७-अ, दि.१६.०६.२०१५
३. मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.नंदुरबार पत्र क्र. जिपनं/साप्रवि/आस्था-ब/१२७/२०२०/दि. ६.३.२०२०.
४. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांचे पत्र क्र.एबाविसेयो/आस्था/का-१/२०१९-२० /११४९,नवी मुंबई दि.१६.३.२०२०
५. वित्त विभाग,शासन, निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३,दि.४.५.२०२०
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.३०/का-१२,दि.७.७.२०२०
७. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.३०/का-१२,दि.२३.७.२०२०

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदींनुसार गट-अ संवर्गातील खालील अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव पुढीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिका-यांचे नाव व सध्याचे कार्यरत कार्यालय | बदलीनंतर पदस्थापनेचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.बी.जी.भवाने,जिल्हा कार्यक्रम अधिकारी (मवबावि) जि.प.नंदुरबार | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ना), बोरिवली-२ | श्री.भवाने यांनी त्यांच्या मुळ पदाचा कार्यभार श्री. के.एफ.राठोड, बाविप्रअ, धुळे यांच्याकडे सोपवून बदलीच्या ठिकाणी हजर व्हावे. |

१. उपरोक्त अधिकाऱ्याने त्यांच्या मुळ पदाचा कार्यभार वरील रकाना - ४ मध्ये दर्शविल्यानुसार अधिकाऱ्यांकडे सुपूर्द करून कार्यमुक्त व्हावे व बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. संबंधित अधिकारी बदलीच्या पदावर हजर झाल्यानंतर तात्काळ कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्रासह त्यांचा रुजू अहवाल आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या मार्फत विहित मार्गाने शासनास न चुकता विनाविलंब सादर करावा.

२. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे व आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना कळविण्यात येते की, विहित कालावधीत संबंधित अधिकारी रुजू न झाल्यास त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही प्रस्तावित करावी व तसा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

३. वरीलप्रमाणे करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

४. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्याची पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये व महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

५. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्याला पदस्थापना देण्यात आलेल्या पदावर रुजू करुन घेताना, ते रजेवर / गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय / परिपत्रकांतील निदेशांचे पालन करावे.

६. वरील रकाना - ४ मध्ये दर्शविल्यानुसार संबंधित अधिकारी त्यांना देण्यात आलेल्या पदांचा अतिरिक्त कार्यभार धारण करतील त्या दिनांकापासून त्यांना त्या कार्यालयाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर अधिकाऱ्यांनी त्यांना देण्यात आलेला अतिरिक्त कार्यभार स्वीकारला नाही तर त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही प्रस्तावित करण्यात येईल.

७. सदर बदली प्रशासकीय कारणास्तव असल्याने उपरोक्त अधिकाऱ्याला बदली विषयक प्रवासभत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहील.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१३१६२७३९७०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Rajendra Tanaji Bhalwane

Digitally signed by Rajendra Tanaji Bhalwane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d2758148ccaa24d1fb27b9df, serialNumber=badfc0daa40cc485400aad9ceabcd514095659a6cdfac856815518dcd188c23a, cn=Rajendra Tanaji Bhalwane
Date: 2020.08.13 17:08:33 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, कोकण भवन, नवी मुंबई
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद धुळे
४. मा.मंत्री (म.व बा.वि.वि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.सचिव (म.व बा.वि.वि),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,मुंबई
७. विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास,नाशिक विभाग
८. महालेखापाल १ /२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर (आयुक्तालय, पुणे मार्फत)
९. संबंधित अधिदान व लेखाधिकारी / जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालय, पुणे मार्फत)
१०. संबंधित अधिकारी.
११. निवड नस्ती कार्यासन-७.